‘**मुख्यमंत्री माझी शाळा, सुंदर शाळा**’ या अभियानाच्या पुरस्काराच्या रकमेत सुधारणा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुमंअ २०२३/प्र.क्र.११४/एसडी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ०७ मार्च, २०२४

**वाचा:-** १) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग समक्रमांक दि.३०.११.२०२३.
२) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आशिका/मुमंअ/सुंदर शाळा/२०२३/ईगव्हे-१४३, दि.०३.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्यातील सर्व माध्यमांच्या सर्व व्यवस्थापनांच्या शाळांकरीता **‘मुख्यमंत्री माझी शाळा, सुंदर शाळा’** हे अभियान राबविण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. यासाठी शासकीय शाळा व अन्य व्यवस्थापनांच्या शाळा याकरीता प्रत्येक स्तरावर खालीलप्रमाणे स्वतंत्र पारितोषिके निश्चित करण्यात आली होती.

**(रक्कम रु.लक्ष)**

| अ. क्र | स्तर | पहिले | दुसरे | तिसरे | शासकीय व निमशासकीय | उर्वरित इतर व्यवस्थापन | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | राज्यस्तरीय-१ | ५१ | २१ | ११ | ८३ | ८३ | १६६ |
| २ | विभागस्तरीय-८ | २१ | ११ | ७ | ३१२ | ३१२ | ६२४ |
| ३ | बृहन्मुंबई-१ | २१ | ११ | ७ | ३९ | ३९ | ७८ |
| ४ | अ व ब मनपा-१ | २१ | ११ | ७ | ३९ | ३९ | ७८ |
| ५ | जिल्हास्तरीय-३६ | ११ | ५ | ३ | ६८४ | ६८४ | १३६८ |
| ६ | तालुकास्तरीय-३५८ | ३ | २ | १ | २१४८ | २१४८ | ४२९६ |
| | | | | | | **एकूण** | **६६१०** |

सदर अभियान दि.०१.०१.२०२४ ते दि.१५.०२.२०२४ या कालावधीत संपूर्ण राज्यात राबविण्यात आले. सर्व व्यवस्थापनांच्या व माध्यमांच्या जवळपास ९५% शाळांनी यात सहभाग नोंदविला. या शाळांमधील सुमारे २ कोटी विद्यार्थी विविध उपक्रमात सहभागी झाले. अभियानास भरभरून मिळालेला हा प्रतिसाद निश्चितच वाखाणण्याजोगा आहे. सर्व स्तरावरील पारितोषिकांच्या रकमेत सुसूत्रता असावी यासाठी विभाग व राज्यस्तरावरील पारितोषिकांच्या रकमेत अंशत: वाढ करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.२ अन्वये शासनास सादर करण्यात आला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

**‘मुख्यमंत्री माझी शाळा, सुंदर शाळा’** या अभियानासाठी संदर्भ क्र.१ अन्वये निश्चित करण्यात आलेल्या राज्यस्तर व विभाग स्तरावरील पारितोषिकांच्या रकमेत खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**(रक्कम रु.लक्ष)**

| अ. क्र | स्तर | पहिले | दुसरे | तिसरे | शासकीय व निमशासकीय | उर्वरित इतर व्यवस्थापन | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | राज्यस्तरीय-१ | ५१ | ३१ | २१ | १०३ | १०३ | २०६ |
| २ | विभागस्तरीय-८ | २१ | १५ | ११ | ३७६ | ३७६ | ७५२ |
| ३ | बृहन्मुंबई-१ | २१ | १५ | ११ | ४७ | ४७ | ९४ |
| ४ | अ व ब मनपा-१ | २१ | १५ | ११ | ४७ | ४७ | ९४ |
| ५ | जिल्हास्तरीय-३४ मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून | ११ | ५ | ३ | ६४६ | ६४६ | १२९२ |
| ६ | तालुकास्तरीय-३५३ मुंबई-३, पुणे शहर-१ व नागपूर शहर-१ वगळून | ३ | २ | १ | २११८ | २११८ | ४२३६ |
| | | | | | | **एकूण** | **६६७४** |

२. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये अभियानाचा एकूण खर्च रु.८६.७३ कोटी यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. उपरोक्त परि.१ मध्ये दर्शविल्याप्रमाणे राज्यस्तर व विभागस्तरावरील पारितोषिकाच्या रकमेत वाढ केल्यामुळे पारितोषिकांच्या एकूण रक्कम रु.६६.१० कोटी ऐवजी रु.६६.७४ कोटी इतकी झाली आहे. रु.६४.०० लक्ष इतक्या अतिरिक्त वित्तीय भारास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तथापि अभियानासाठी मंजूर करण्यात आलेल्या मूळ वित्तीय तरतुदीतून हा खर्च भागविण्यात यावा व यासाठी कोणतीही अतिरिक्त तरतूद उपलब्ध करून दिली जाणार नाही या अटीच्या अधीन राहून सदर मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च मागणी क्रमांकई-०२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, १०१, शासकीय प्राथमिक शिक्षण,(००)(०१) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे (कार्यक्रम) (२२०२ जे ०७२) ५०-इतर खर्च या लेखाशीर्षाखालील सन २०२३-२४ या चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व लेखाधिकारी, प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे.

४. सदर शासन निर्णय शासनाच्या सहमतीने व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०७१७५३२६५२२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.07 18:04:41 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.सभापती व मा.उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
६. मा.अध्यक्ष व मा.उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
७. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, मुंबई.
८. मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा.मंत्री (सर्व) यांचे यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. विभागीय आयुक्त (सर्व)
१२. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१३. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण संचालनालय, पुणे
१४. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई,
१५. जिल्हाधिकारी सर्व,
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व,
१७. शिक्षण संचालक ( प्राथमिक ), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१८. शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च-माध्यमिक ), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, राज्य, पुणे,
१९. संचालक, महाराष्ट्र राज्य, पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ(बालभारती), पुणे,
२०. अध्यक्ष,राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे,
२१. शिक्षण संचालक (योजना), पुणे
२२. सहसंचालक,(प्रशासन), शिक्षण आयुक्तालय, पुणे
२३. विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)
२४.शिक्षण सहायक संचालक(सर्व)
२५.गटविकास अधिकारी (पंचायत समिती)(सर्व)
२६.मुख्याधिकारी, नगरपालिका, सर्व
२७.शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/योजना), जिल्हा परिषद (सर्व)
२८.गटशिक्षणाधिकारी (सर्व)
२९. विस्तार अधिकारी (शिक्षण)(सर्व)
३०.उपशिक्षणाधिकारी (सर्व)
३१.शिक्षण निरीक्षक (सर्व)
३२.प्राचार्य जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, (सर्व)
३३.प्रशासन अधिकारी, महानगरपालिका(सर्व)
३४.स्थानिक स्वराज्य संस्थेच्या प्राथमिक/उच्च प्राथमिक शाळेचे मुख्याध्यापक(सर्व)
३५.खासगी अनुदानित संस्थेच्या माध्यमिक शाळेचे मुख्याध्यापक (सर्व)
३६.निवड नस्ती (कार्यासन-एसडी-६).